अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सांख्यिकी अधिकारी/ संशोधन अधिकारी/ जिल्हा सांख्यिकी अधिकारी इत्यादी गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील पदावर पदोन्नतीने नियुक्ती

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः पदोनि १२१४/प्र.क्र.३८/का-१४२७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२(४)

तारीख: १० सप्टेंबर, २०१४.

**शासन आदेश**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन सहायक, गट-ब (अराजपत्रित) संवर्गातील श्री. र. वि. गावित, संशोधन सहायक यांना सांख्यिकी अधिकारी/संशोधन अधिकारी/जिल्हा सांख्यिकी अधिकारी इत्यादी गट-ब (राजपत्रित) (वेतनसंरचना, वेतन बॅड ₹९,३००-३४८०० + ग्रेड वेतन ₹४,४००) पदावर केवळ तात्पुरत्या स्वरुपात खालील परिच्छेद-२ येथे नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मधील दर्शविलेल्या पदावर ते त्या पदाचा पदभार स्वीकारतील त्या दिनांकापासून ९ ऑगस्ट, २०१५ पर्यन्त किंवा नियमित अधिकारी उपलब्ध होईपर्यन्त केवळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. दिनांक ९ ऑगस्ट, २०१५ (म.नं.) सदरची पदोन्नती आपोआप संपुष्टात येईल.

| **अ.क्र.**<br>**१** | **संशोधन सहायकांचे नांव, सध्याचे पदनाम व कार्यालयाचा पत्ता**<br>**२** | **प्रवर्ग**<br>**३** | **पदोन्नतीनंतर पदस्थापना करण्यात आली ते पद व कार्यालय**<br>**४** |
|---|---|---|---|
| १. | श्री. र. वि. गावित, संशोधन सहायक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई | अ.ज. | सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर |

२. सदर पदोन्नती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहेत :-

सदर आदेश निर्गमित झाल्यापासून ३० दिवसाच्या आंत पदोन्नतीच्या पदाचा पदभार स्वीकारावा व तसे केल्याबद्दल कार्यभार हस्तांतर प्रमाणपत्र संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांच्याकडे पाठविण्यात यावे. विहीत कालावधीत पदोन्नती न स्वीकारल्यास संबंधित अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीचे आदेश आपोआप रद्द होतील.

१) सदर पदोन्नतीचे आदेश प्राप्त झाल्यापासून संबंधीत संशोधन सहाय्यकांना शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये.

२) पदस्थापनेत बदल करण्याकरिता कोणत्याही स्वरुपात राजकीय दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास ही बाब गंभीर ठरवून शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यात येईल.

३) पदोन्नती आदेश प्राप्त झाल्यानंतर जे संशोधन सहाय्यक पदोन्नती स्वीकारणार नाहीत किंवा विविध सबबीखाली पदस्थापना स्वीकारण्यास टाळाटाळ करतील त्यांना आश्वासित प्रगती योजनेंतर्गत देण्यात आलेले लाभ काढून घेण्यात येतील.

४) पदोन्नतीनंतर संबंधीत संशोधन सहाय्यक पदोन्नतीच्या पदावर रुजू न झाल्यास त्यांना पदोन्नतीबाबत स्वारस्य नसल्याचे समजून सामान्य प्रशासन विभागाच्या स्थायी आदेशानुसार निवडसूचीतून त्यांचे नांव वगळण्यात येईल. तद्नंतर कोणत्याही परिस्थितीत त्यांची विनंती मान्य करता येणार नाही.

५) संबंधीत कार्यालय प्रमुखांनी संबंधीत संशोधन सहायकांच्या पदाचा पदभार अन्य कर्मचा-यांकडे सोपवून त्या संशोधन सहाय्यकांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे. व ज्या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेली आहे त्या पदावर त्यांना संबंधीत कार्यालय प्रमुखांनी रुजू करुन घ्यावे. एखादया कार्यालयाने रुजू करुन घेण्यास टाळाटाळ केल्यास व सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी नियमित करण्याचा प्रश्न उद्भवल्यास कोणत्याही परिस्थितीत सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी नियमित करता येणार नाही.यासंदर्भात वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक:सेनिवे-१००१/१३०/ सेवा-४, दि.२.०६.२००३ मधील परिशिष्ट-१, नियम क्र.९ (१४)(एफ) शेरा क्र.२ नुसार सक्तीचा प्रतिक्षा कालावधी निर्माण होण्यास जबाबदार ठरणा-या संबंधित अधिका-यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

६) या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे उपरोक्त कर्मचारी पदावरील नियमित पदोन्नतीसाठी पात्र आहेत असा या पदोन्नतीचा अर्थ होणार नाही व या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे त्यांना नियमित पदोन्नतीचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

७) सदर पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र.८४५२/२००४ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील. त्याचप्रमाणे, यासंदर्भात विविध न्यायालयांत प्रलंबित असलेल्या अन्य याचिकांच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील. तसेच मा. सत्र न्यायालय, ठाणे यांचेकडील क्रिमिनल अपील क्र. ३३७/२०१३ वर पारित होणाऱ्या अंतिम आदेशाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

८) सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहेत.

9)उपरोक्त अधिकाऱ्यांना मा. सत्र न्यायालय, ठाणे येथील क्रिमिनल अपील क्र. ३३७/२०१३ मध्ये पारित होणाऱ्या अंतिम आदेशाच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात आली असल्याने अंतिम आदेशानुसार उपरोक्त अधिकारी दोषी ठरल्यास त्यांची पदोन्नती रद्द होऊन, आदेशित केलेल्या शिक्षेनुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१०१७२२५२९८१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Maroti Keshavrao Kendre

Digitally signed by Maroti Keshavrao Kendre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Maroti Keshavrao Kendre
Date: 2014.09.10 17:47:29 +05'30'

( मा. के. केन्द्रे )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर,

२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर,

३. मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

४. मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

५. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग

६. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, कोकण

७. जिल्हाधिकारी, मुंबई शहर

८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),

९. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,

१०. सामान्य प्रशासन विभाग (का.१२/का.१६ ब), मंत्रालय, मुंबई,

११.सर्व सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय,*

१२.अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,

१३.नियोजन विभाग, का.१४२१/का.१४२६, मंत्रालय, मुंबई,

१४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१५.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

१६. सर्व जिल्हा नियोजन अधिकारी , जिल्हा नियोजन समिती,

१७.सर्व जिल्हा सांख्यिकी अधिकारी, कोषागार कार्यालय,

१८.संबंधित अधिकारी संशोधन सहायक,*

१९.निवडनस्ती, कार्यासन १४२७, नियोजन विभाग,

* संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत